# हळदीघाटाला समर्पित रणांगण

₹ ५०














महाराणा प्रताप राजस्तानात सर्वात जास्त पूजनीय आहेत. ते बहाद्दर देशभक्त आणि उदार हिंदू भारतीय क्षत्रिय होत.

## हळदी घाटाला समर्पित रणांगण





विंग कमांडर शशिकांत ओक
मो. ९८८१९०१०४९ मार्च २०२२

₹ ५०

कृपया लक्षात घ्या: ब्रिटीश उच्चारांचा प्रभाव कमी करण्यासाठी नावे भारतीय शैलीमध्ये लिहिली आहेत.



महाराणा प्रताप राजस्तानात सर्वात जास्त पूजनीय आहेत. ते बहाद्दर देशभक्त आणि उदार हिंदू भारतीय क्षत्रिय होत.

# हळदी घाटाला समर्पित रणांगण



- जगातील समरात अशा प्रकारचे हत्ती युद्ध 'बऱ्याच मोठ्या सैन्या विरुद्ध थोडेसे' म्हणून नामांकित झाले आहे.
- या मोहिमेवर इतिहासकारांनी अनेक भाष्ये केली आहेत.
- लढाई जिंकली तरी पण हरली. असेही याचे वर्णन केले जाते.
- चेतक नामक अश्वाचा या लढाईत महाराणा प्रतापांच्या बरोबरीने गौरव केला जातो. युद्ध कथांमधून त्यांच्या शौर्याच्या कहाण्या, पोवाड्यातून स्मृतीत चिरकाल राहतील.




भारतीय सेना







# सध्याच्या भूसेना, वायुसेना, नौसेना तज्ज्ञ



# लष्करी अधिकार्यांनी केलेली मांडणी

# मेवाड राज्य नेमके आहे तरी कुठे?
# हळदी घाटी आजकाल दिसते कशी?







Warni Ki Bhagal

Actual narrow Pass of Haldi

Chetak Smarak H

# मेवाड राज्याचे प्रतीक

**बोधवाक्य - जे खंबीरपणे धर्माचे रक्षण करतात; ते दैवी शक्तीने संरक्षित असतात.**



# हे सादरीकरण करण्याचा हेतू काय ?

- महाराणा प्रतापांनी केलेल्या युद्धात कोणती चूक केली हे दर्शविण्याचा कोणताही हेतू नाही.
- युद्ध कसे लढले गेले याची एक सामान्य कल्पना जाणून घेण्याचा उद्देश आहे. आजच्या लष्करी कमांडरना या युद्धाच्या युद्ध-रणनीतिक दृष्टिकोनातून ऑर्डर मिळाल्यास, ते तयारीची योजना कशी करतात?
- लष्करी सैन्याने युद्धातील विविध पैलूंचे चिकित्सक विश्लेषण कसे करावे. युद्ध जिंकण्याचे ध्येय साध्य करताना बदलत्या परिस्थितीनुसार त्यातील योजनात कसे समयोचित पर्यायी बदल करतात?
- त्या काळातील साधनांच्या उदा. हातात घड्याळ नाही. डोळ्याला चष्मा नाही, काड्यापेटी किंवा लायटर नाही, मर्यादा विचारात घेऊन त्यांनी त्या लढाई कशी लढली होती या संकल्पनांवर संशोधन आधारित आहे.

# “त्या वेळी समर असेच झाले” असा दावा आहे का ?

- हे समर संशोधनात्मक स्वातंत्र्य घेऊन बनवले आहे. म्हणून प्रत्यक्ष घडलेले समर असेच घडले असा दावा मुळीच नाही.
- भारतीय इतिहासात अनेक ठिकाणी मान्यताप्राप्त नेमके किंवा ढोबळ ऐतिहासिक तपशील, तत्थे, पुरावे सध्या उपलब्ध नाहीत.
- म्हणून सध्या मान्यता असलेल्या माहिती आधारे समर प्रसंग उभा केला आहे.
- अशा वेळी ऐतिहासिक व्यक्तींच्या पुर्व आणि उत्तर जीवनातील वर्तणूक, शौर्य, धैर्य, हिम्मत, लष्करी व्यवस्थापनाची कौशल्ये, उपलब्ध साधनसामुग्री, शस्त्रसंभार यांची जाणीव ठेवून ह्या काल्पनिक समराची मांडणी केली आहे.

# अस्वीकरण

- या सादरीकरणात वापरलेले फोटो, हस्तकला, भिन्न ध्वनी, व्हिडिओ क्लिप, व्यक्तिमत्त्व आणि चेहऱ्याचे भाव प्रतिनिधिक म्हणून वापरले जातात. त्यांचा गैरवापर करण्याचा आमचा हेतू नाही.
- तथापि, जर काही कारणास्तव कॉपीराइटचे उल्लंघन केले गेले असेल तर ती सामग्री वगळली जाईल.



# हळदी घाटातील लढाई मोहिमेपूर्वी राजकीय परिस्थिती काय होती? 1

❖ या प्रश्नाला उत्तर देताना लष्कराचे अधिकारी म्हणतात -

❖ १. आम्ही इतिहासकार नाही. परंतु सामान्य माहितीवरून असे म्हणता येईल की ...

❖ २. राजा अकबर (वय ३२) मेवाड राज्य मोगल राजवटीखाली आणू इच्छित होते. शांततेच्या चर्चेचे पूर्वीचे चार प्रयत्न अयशस्वी झाले होते.

❖ ३. सन १५७६ मध्ये, राजकुमार - आमेर (जयपूर) राज्यातील कुंवर मानसिंह (वय २७) या मोहिमेचे नेतृत्व केले.

❖ ४. योजनेनुसार, महाराणा प्रताप (३७) यांना पकडले किंवा मारले जावे. त्यांचा गोगुंदा आणि कुम्भलगड किल्ला ताब्यात घेतला जावा. राजा अकबराला राजपूतांचे वर्चस्व संपवायचे होते. मुगल सत्तेला व्यापारी मार्गावर कर महसूल मिळवायचा होता.



# हळदी घाटातील लढाई मोहिमेपूर्वी राजकीय परिस्थिती काय होती? २

- ५. राणा प्रताप युद्धात जखमी झाले, पण त्यांना पकडता आले नाही. अशा प्रकारे, राजा अकबरच्या बाजूने मोहीम अयशस्वी झाली. त्यामुळे, कुं. मानसिंह यांना पुढील २ वर्षे दरबारात येण्याची परवानगी नव्हती!
- ६. युद्धात रणगाडे म्हणून हत्तींचा वापर केला जात असे. चेतकचा घोडा हत्तीने जखमी झाला आणि राणा प्रतापांना हळदी खिंड (घाटा) च्या डोंगर खिंडीत विखुरून जावे लागले.
- ७. १५९७ मध्ये महाराणा प्रताप यांचे निधन झाले. १६१५ मध्ये मेवाड राज्य आणि मुगल यांच्यात शांती करार झाला. मेवाड राजघराण्यातील महिलांचे धर्मांतर होणार नाही. ५ हजारी मनसबचा सन्मान दिला जाईल. पण मेवाड शासक दरबारात उपस्थित राहणार नाहीत वगैरे कराराची काही कलमे होती.

# राजा अकबर व राणा मानसिंह यांच्यातील खलबते

- अजमेरच्या ख्वाजा मोईउद्दीन चिस्तीच्या दर्ग्याला चादर चढवायला अकबर दरवर्षी येत असे. १५७५ साली त्याने मानसिंहाला बोलावून राणा प्रतापाचा कायमचा काटा काढायचे ठरवले.
- वाटाघाटीची बोलणी फिस्कटल्याने मेवाड़ राज्य युद्ध करून कायमचे मुगलांच्या आखत्यारीत आणावे असे ठरले.
- त्याप्रमाणे मानसिंहाने आमेड़हन आपली ६ हजार व मुगलांची १० हजार फौज फतेपुरहून मांडलगडाला एकत्र येईल. ती मानसिंहाच्या नेतृत्वाखाली लढेल असे ठरले.
- मानसिंहाला लढाई जिंकल्यावर दरबारात सन्मानाचे वरिष्ठपद दिले जाईल.



# राजा अकबराने या मोहिमेत कसा सहभाग घेतला होता?

- लेफ्टनंट जनरल राजेंद्र निंभोरकर म्हणतात:
- अकबराने आखणी केली आणि पूर्तता कुंवर मानसिंहाकडे सोपवली. ती अशी...
- १. हळदी घाटाच्या अलिकडे बनास नदीच्या काठावर असलेल्या अरुंद, सपाट भागात लढाई करायला भाग पाडायचे.
- २. मुगलांच्या सैन्याने आधी तोफखान्याचा नंतर हत्ती, घोडदळाचा वापर करायचा.
- ३. प्रतापाच्या गनिमीकाव्याने लढणाऱ्या मेवाड सैन्याला गराडा घालून शरण यायला भाग पाडायचे.



# अकबराने या मोहिमेत कसा सहभाग घेतला होता?

- ४. गोगुंदा गड आणि कुम्भलगडाच्या परतीच्या वाटा बंद करायच्या. नंतर ते गड सर करायचे.
- ५. अकबराने आपले निवडक सरदार व त्यांची सेना या मोहिमेत मानसिहाला देऊन एका बाजूने त्याच्यावर लक्ष ठेवायची सोय केली.
- ६.जर काही कारणाने प्रतापाकडे तो झुकला तर त्याची बातमी मिळावी.
- ७. युद्धातील धामधुमीच्या काळात ऐनवेळी मानसिंह पकडला गेला किंवा मारला गेला तर सेनेचे नेतृत्व मुगल सरदांरानी साभाळावे याची खबरदारी अकबराने घेतली होती.

## मेवाड राज्य

- राणा प्रताप सिंह सिसोदिया
- चरण जयसिंह
- चरण कैसा सिंह
- दोडिया भीम सिंह
- रामदास राठौर
- राम साह तंवर
- हकीम खान सूर
- भामा शाह
- ताराचंद
- बिदा झाला
- राव पूंजा भिल

## मुगल सामाज्य

- कुं. मानसिंह कछवा
- सैय्यद अहमद खान बरहा
- सैय्यद हाशिम बरहा
- जगन्नाथ कछवा
- घियासुद्दिन आसफ खान
- माधोसिंह कछवा
- मुल्ला काज़ी ख़ान
- राव लुणकरण
- मिहत्तर खान

# दोन्हीबाजूच्या सरदारांची नावे



# युद्धासाठी कुं. मानसिंहांची उद्दिष्टे कोणती होती?




- १. राणा प्रतापाला अकबरासमोर जीवंत सादर करणे. न जमल्यास, त्याला स्वतःने ठार करणे.
- २. राणा प्रतापांच्या बाजूने लढणाऱ्या सरदारांचे अकबराशी वैमनस्य त्वरित थांबवणे. त्यांना स्वेच्छेने मुघल सैन्यात सामील होण्याची परवानगी देणे.
- ३. गोगुंदा किल्ला ताब्यात घ्यावा व त्यावर अधिकार मिळवावा.
- ४. अकबरच्या दरबारात उच्च प्रतिष्ठा व मान मिळवणे.



# मुगल सैन्याची युद्धनिती १

- मानसिंह याची युद्धनिती काय असावी? आर्मी कमांडर म्हणतात...
- मेवाड राज्याची सीमा बनास नदीच्या काठाने पार करून मोलेलाच्या टेकडीवरून पुढे पोहोचल्यावर गोगुंदाच्या किल्ल्याकडे वाटेवर हळदी घाटी पार करणे.
- तिथे राणा प्रताप आपले सैन्य घालून आपल्यावर हल्ला करू शकतो. म्हणून खामनोरपाशी त्याला गाठले तर युद्धाची भूमी डोंगराळ भागापेक्षा नदीच्या सपाटीवर करणे सोईचे आहे.
- हेरांकडील माहितीवर आधारित प्रताप मोगलांना हळदीघाटीत रोखण्याचा प्रयत्न करेल. जेणेकरून लढा न देता तो गोगदा किल्ला वाचवेल. हल्ल्याच्या तीन बाजूंनी मात करण्यासाठी मोगल सैन्याने विखुरलेले राहिलेले हवे. डावा, उजवा आणि मध्यभागी मला (मानसिंहांना) राहून कमकुवत किंवा कुचकामी सैन्य फळीला मजबूत करण्यासाठी त्यांना एकमेकांशी संपर्कात ठेवणे.



# मुगल सैन्याची युद्धनिती २

- भिल्ल सैन्याच्या हल्ल्याच्या सुरुवातीच्या बाणांचा प्रतिकार करण्यासाठी, त्यांना घाबरवण्यासाठी मुगल तोफखाना लावला पाहिजे.
- मानसिंहांनी विजयाच्या संभाव्यतेचे निरीक्षण करण्यासाठी हत्तीवरून युद्धाचे संचलन निरीक्षण स्वतः करायचे आहे.
- जेव्हा राणा प्रताप समरांगणात दिसेल तेव्हा अंतराचा फायदा घेण्यासाठी राजा मानसिंहानी युद्धात सामील व्हायचे. दूर अंतरावरून भाले फेकत राहायचे.
- राणा प्रतापाचे लक्ष वेधण्यासाठी धनुर्धारी प्लाटूनांनी त्यांचे बाण संपले की मागील तुकडी पुढची त्यांची जागा घेत त्याला दूरवर थोपवून धरायचे आहे.



# मुगल सैन्याची युद्धनिती ३

- एखाद्याला शत्रूच्या बाणामुळे मारले गेले किंवा जखमी केले तर त्यांना माऱ्यापासून लांब नेण्यासाठी बुणगे कामगार लोकांची सोय करावी. जखमी घोडे व स्वारांना घोड्यावरून खाली खेचून दूर सुरक्षित ठिकाणी न्यावे.
- युद्धासाठी प्रशिक्षित हत्तींना आपल्या योजनेच्या विरोधात लढाई सुरू झाल्यास तयार ठेवावे. हत्तीदळ रणांगणात येत आहे हे सांगणारे ढोल, ताशा, झेंडेधारी व रण शिंग फुंकणारे आणि इतर मोठ्या आवाजात हातवारे करून खुणेचे इशारे देत राहावे. जेव्हा हत्ती रणांगणात येतात तेव्हा सैन्यानी पायदळी तुडवू जाऊ नये याची खबरदारी घेत राहावे.
- हत्तीच्या दातांना लावलेल्या तलवारीच्या आवाक्यापासून लांब जावे. लक्षात ठेवा कि रागावलले हत्ती माहूताचे देखील ऐकत नाही. हत्तींना शत्रू सैन्याच्या आत जाऊन माहूतच मार्गदर्शन करतो. पण त्याला सभोवताली रक्षणकडे करायची देण्यासाठी त्यांचे सैनिकानी अनुसरण करावे.



# मुगल सैन्याची युद्धनिती ४

- शत्रू हत्तींशी थेट संघर्ष टाळण्यासाठी त्यांना दूर ठेवले पाहिजे. तलवारीसह घोड्येयावर स्वार होणाऱ्या धनुष्य बाणांच्या कंपनीने त्यांचा सामना केला पाहिजे. लपलेल्यांनी बाजूच्या झुडुपे आणि टेकडीवरील चढणांची व्यवस्था ओळखून दूर अंतरावरून शत्रू सैन्याला जेरीला आणावे. नाही जमले तर ठरलेल्या जागेपासून लढत राहावे.
- कैद झालात तर सुटण्याचा प्रयत्न करावा. जेव्हा घोडे एखाद्या गोष्टीने विचलित झाल्यास स्वाराला खाली आदळतात. डोक्यावरुने पाय देतात याचे भान ठेवा. त्यांच्या समोर जाऊ नका.
- मरण टाळण्यासाठी शस्त्रे खाली ठेवा. हात वर करून शरण जा. जोरात ओरडून, शिंगे, इतरर वाद्यांनी किंवा झेंडे फडकावून मदतीसाठी प्रयत्न करा. कुठूनही देण्यात येणाऱ्या इशाऱ्यांकडे नेहमीच लक्ष ठेवा. गोंधळात असताना जोरात ओरडाकरत आपली रण गर्जना करत रहा.
- समोरचा शिपाई पोषाखावरून मुस्लिम नसेल तर शत्रू कोण, मित्र कोण याची खात्री करण्यासाठी लढाईचा नारा द्या किंवा त्यांच्या संबंधित सरदारांच्या नावाने पूकारा करा. अन्यथा आपल्याकडून लढणाऱ्या सैनिकाला आपणच मारून टाकायची शक्यता टाळा.



# मेवाड सेनेची युद्धनिती - १

- बनास नदी ओलांडून मेवाड राज्यात मुगल सेनेला प्रवेश करून देणे.
- मुगलांना गोगुंदा किल्ला सर करता येऊ नये. यासाठी हळदी डोंगरांच्या चिंचोळ्या खिंडीत गाठून तिथे त्यांना दाबून माघार घ्यायला भाग पाडणे.
- माघारी जाणाऱ्या सेनेला शस्त्रे टाकून शरण आणणे.
- लढाईत कुं. मानसिंहाला हरवून राजा अकबराचे मेवाड राज्याला आपल्यात सामावण्याचे स्वप्न पूर्ण विरून टाकणे.



# मेवाडसेनेची युद्धनिती - २

- राजे-राण्यांचे कुटुंबिय, वृद्ध, पैसे खजिने, धान्य रसद सुरक्षित कुम्हलगडावर नेऊन ठेवणे.
- स्व सैन्याला खामनोरच्या डोंगराळ भागात जमवणे.
- तोफखान्याने  मुगलसेनेला बनासनदीतूनओलांडून न देणे.
- डोंगरात धनर्धारी भिल्ल सेनेच्या प्लाटूननी लहाने मोठ्या लांबीचे विषाच्या खळीत बुडवलेले, तेल माखून जाळ करणाऱ्या बाणांचे भरपूर गठ्ठे तयारे ठेवणे.
- मुगलांवर बाणांचे वर्षाव करून गोंधळ करून पळवून लावायला लहान टोळ्याकरून हळदी खिंडीत दडून बसणे.
- घोडदळाने मुगलसेनेला मागून घेरून त्यांची शस्त्रे, रसद तोडणे.
- पायदळाच्या प्लाटूननी तोफखान्याच्या आडोशाने हल्ले करत राहणें.



# मेवाडसेनेची युद्धनिती - ३

- युद्धाचे पारडे कुठे झुकते आहे ते पाहून युद्ध हत्तींना समरात घालून मुगलांच्या सेनेला विस्कळीत करून पळवून लावणे.
- महाराणा आपल्या हत्तीवरून लढाईचे निरीक्षण करत निर्देश देतील.
- ध्वजपाल, बातमीदार, शस्त्रे, पोहोचवणारे यांना प्राधान्य देऊन लढणाऱ्या शिपायांचे मनोधैर्य उंच ठेवायला मदत करतील.
- कुं. मानसिंह व त्याच्या सरदारांना पकडून शरणागतांचा मागण्या व वाटाघाटींसाठी उपयोग करणे.



# मेवाडकर सैन्याचे भविष्यकालीन लढण्यासाठी नियोजन काय होते ?

- ❖ मुगल राज्यसत्तेला टक्कर देऊन टिकलेले मेवाड एकमेव राज्य होते. त्याला शाबूत ठेवणे.
- ❖ आजुबाजूचे बरेच राजे आपल्या निष्ठा, सोय व फायद्यासाठी बदलत्या ठेवू नयेत असा बंदोबस्त करणे.
- ❖ ज्या वरिष्ठ सरदारांमुळे प्रतापांचा राज्याभिषेक झाला त्यांची मर्जी सांभाळणे.
- ❖ आदिवासी भिल्ल जमातीच्या सरदारांना आपलेसे करून सेनेत सन्मानाची वागणूक देणे.
- ❖ उदयसिंहांनी चितोड, उदेपुर किल्ले गमावल्याने पैसा, शस्त्रे, मनुष्यबळ राखून लढाया जिंकायला जीवन मरणाची अटीतटी करून शर्थ करणे.



# कुं. मानसिंह सुमुहुर्तावर प्रयाण करतात

- राजा मानसिंह यांनी ३ एप्रिल १५७६ रोजी (विक्रम संवत १६३३, वैशाख कृष्णा दशमी, शनिवारी) सर्वार्थ सिद्धी योग असताना आमेर किल्ल्यातून प्रयाण केले. आता त्याला जयपूर किल्ला म्हणून ओळखले जाते.



10, Vaishakha
Krishna Paksha, Dashami
1633 Tarana, Vikrama Samvata
Jaipur, India

03
April 1576
Saturday

Sarvartha Siddhi Yoga, Bhadra

- सैन्यात सुमारे ३००० पायदळ आणि १००० घोडेस्वार सैनिकांचा समावेश होता. शिवाय बाजार बुणगे, हत्ती, घोडे, भार वाहणारे प्राणी ऊंट, गाढव इत्यादि जनावरे व कर्मचारी समावेत होते.

# कुंवर - राजकुमार - मानसिंह आमेर किल्ल्यातून हत्तीवरून टोंक – मांडलगडाकडे निघाले...



कुं. मानसिंह हत्तीवरून आमेर किल्ल्यातून आपल्या सैन्यासह मांडलगड कडे निघाले.



हत्तींचा काफिला नदीतून जाताना प्रातिनिधिक चित्र...

# आमेर किल्ला सध्याचे जयपुर ते टोंक अंतर १०० किमी



# कुं. मानसिंहांची सेना टोंक ते मांडलगड १४० किमी बनास नदीच्या किनाऱ्याने निघाले.



# राजा अकबराची राजधानी फतेपुर किल्ल्यात होती. तिथून मुगलसैन्य कुं.मानसिंहांच्या नेतृत्वाखाली लढायला निघाले.




Buland (Massive) Gate बुलंद दरवाजा – दफ्तरखाना- Offices

# मुगल सेना फतेहपुर सीकरीहून धौलपुरला ६४ किमी



# मुगल सेना धौलपुरहून बुंदी पर्यंत २६० किमी



# मुगलांची सेना बुंदीहून डोंगराळ भागातून मांडलगडावर येत राहिली



# कुं. मानसिंह व अन्य मुगल सेना मांडलगडावर जमली



# मुगलांचे एकत्रित सैन्य मोलेलाकडे मांडलगडावरून निघाले.

मांडलगड पासून बनास नदीच्या काठाने प्रवास करत १८३ कि. मी. अंतरावर मोलेला खेडेगावाच्या उंच टेकडीच्या मागे मुगल सैन्य जमा झाले. कुं. मानसिंहानी साधारण १० जूनपासून सर्व सैन्याला रणतंत्र व्यूहरचनेत तयार राहायची आज्ञा केली. महाराणा प्रतापांना जीवे मारायची जवाबदारी स्वतः हाती घेतली.







"त्यांनी मेवाडच्या सैन्याला पराभूत करण्याचे ठरविले होते. नंतर राणा प्रतापचे मुख्यालय असलेला गोगुंद नावाचा किल्ला ताब्यात घ्यायचा ठरते. ज्या सरदारांनी राणा प्रतापाच्या बाजूने लढाईत भाग घेतला त्याचे मन वळवून त्यांना मुगलांच्या सेवेत रुजू व्हायला राजीकरून अकबराच्या दरबारात आपला सन्मान व दर्जा वाढवायसाठी ते झटून कामाला लागले. खबरदारी म्हणून राणा प्रताप कुम्हलगढ किल्ल्याकडे पळून जाऊन जीव वाचवता येऊ नये म्हणून तो मार्ग रोखण्यासाठी एक बटालियन तैनात करण्यात आली.

# मोलेला टेकडीच्या आडोशाला तळ ठोकला...

बनास नदीच्या सीमेलगत मेवाड आणि मुगल राज्यांची सीमा

बनास नदी

सध्याच्या खेडा देवी मंदिराचे टेहळणी केंद्र

❖मोलेला टेकडीवरून निरीक्षण केल्यावर कुं. मानसिंहांनी ठरवले की ते आता मेवाड राज्याची बनास नदीची सीमा ओलांडण्यास तयार आहेत.

❖गुप्तहेरांच्या माहितीवरून महाराणा प्रताप मुगलांना रोखण्याचा प्रयत्न इथे करतील. म्हणून इथल्या डोंगराळ भागात लढाईशिवाय आपण प्रवेश करू शकणार नाही.

❖मुगल सेना डावे, उजवे आणि मध्य अशा तीन बाजूंच्या हल्ल्यांवर मात करण्यासाठी विखुरली गेली. कमकुवत आणि कणखर दलाशी हल्ला करायला ते एकमेकांशी जोडलेले होते.

❖मेवाडच्या भिल्ल सैन्याच्या सुरुवातीच्या बाणांच्या हल्ल्याचा सामना करण्यासाठी मुगलांच्या सेनेने त्यांना घाबरवण्यासाठी तोफखाना तयार ठेवला होता.

# मोलेला टेकडीवर सध्या माता खेडा मंदिर आहे. तिथून दिसणारा परिसर








# मेवाड सैन्य गोगुंदा किल्ल्यावरून कुम्भलगडावर ५७ किमी दूर नेले गेले...

- गोगुंदा किल्ल्यावर काही सैनिक शिल्लक राहिले. बाकीचे
- महाराणा प्रताप आणि त्यांचे इतर सरदार, युद्ध साहित्य, हत्ती, घोडे, उंट आणि खेचर इ. ची कुटुंबे.
- सर्व - कुम्भलगड येथे जाण्याचा आदेश सर्वांना देण्यात आला.
- कुम्भलगड बचावाच्या दृष्टीने भक्कम किल्ला होता.



# कुम्भलगडाकडे रवाना मार्ग




# मार्ग सारिणी

- कुम्हलगड ते खमनोर किमी
- A – माझहेडा ८
- B – मोरछा ८
- C – कोशिवरा २०
- D – मालिदा ४
- E – खमनोर ७
- F – खमनोर रणभूमी ३
- एकूण किमी ५०

# मेवाडकरांची सेना जमवाजमव

# महाराणा प्रतापांचे गोगुंदातील सैन्य
# लोसिंग- कलोदावरुन खामनोरकडे कूच ४९ किमी





# हळदी घाटाच्या लढाईत महाराणा प्रताप यांच्या बाजूने लढणारे प्रख्यात योद्धे.

फोटो सौजन्य आणि कॉपीराइटः महाराणा मेवाड फाउंडेशन, मध्यवर्ती कार्यालय, पॅलेस, उदयपूर.

दृष्य १
०६.३०
सकाळी

# मेवाड लष्कराच्या छावण्यांची तैनाती

महाराणांचा तोफखाना अड्डा

भिल्ल धनुर्धारी डोंगरवरून लपून संरक्षण देतात

Malinda Temple
मलिंडा मंदिर

Raj Gharana Resort Haldighati

बनास नदी किनाऱ्याची रणभूमी

महाराणांचे मुख्य शिबिर १

बनास नदी पात्र

Haldighati.com
हल्दीघाटी डॉट कॉम

हल्दी घाटीत लपलेले भिल्ल प्लाटून

Rakt talai khamnore

Khamnore
खामनोरे

Vandol Mata Temple Khamnor

कुं. मानसिह सेनेचे मुख्य शिविर

महाराणांचे शिबिर २

महाराणांचे शिबिर ४

भिल्ल धनुर्धारी डोंगरवरून लपून संरक्षण देतात

महाराणांचे मुख्य हत्तीदल शिबिर ३

Google

Kheda Devi Mataji Molela
खेड़ा देवी



# हळदी घाटाच्या युद्धाचा आढावा 1

- हे आपण पाहिले आहे की १५७६ सालात जून महिन्याच्या सुरवातीस मुगल सैन्याची हालचाल कशी होत होती. ते तयारी करून सीमाभागात मोलेला गावात कसे पोहचले.
- बनास नदीकाळच्या एका टेकडीवरून जे दृष्य दिसत होते त्यात आजूबाजूचा परिसर पूर्णपणे न्याहाळला जाऊ शकत होता. सैनिकांची शिरगणती झाली. आगामी लढाईसाठी पुनर्रचना करून सगळे शस्त्रसज्ज व्हायला लागले.
- मान्सूनपूर्व वळवाच्या पावसाच्या सरी केंव्हाही कोसळतील असे कुंद वातावरण होते. अपेक्षित हाणामारीची सुरुवात लवकर होणार म्हणून सैन्य घामाच्या धारात जागरूक झाले होते.
- आता मेवाड सैन्याच्या सैन्याच्या हालचाली आणि प्रत्यक्ष लढाई
- **भाग २ मध्ये सादर केली जाईल.**

# महाराणा प्रताप यांच्या शौर्य गाथेला सादर समर्पित !

